**अंध, अस्थिव्यंगाने अधू आणि कण्याच्या विकाराने पीडित असणाऱ्या कर्मचाऱ्यांना वाहतूक भत्ता मंजूर करण्याबाबतच्या तरतूदी....**
**अंधत्वाची व्याख्या सुधारीत करण्याबाबत..........**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः वाहभ-२०१२ / प्र.क्र. २८ /सेवा-५**
मंत्रालय, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरू चौक, मुंबई ४०० ०३२
तारीख: ०३ एप्रिल, २०१७

वाचा -

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक:वाहभ-१३००/प्र.क्र.५७/सेवा-५ , दि.०४ जून, २००१
२) शासन निर्णय वितत विभाग क्रमांक वाहभ-२००९/प्र.क्र७८/सेवा-५, दिनांक ०५.०४.२०१०
३) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक वाहभ-२०१४/प्र.क्र.५/सेवा-५, दिनांक ०३.०६.२०१४
४) शासन शुद्धीपत्रक वित्त विभाग क्रमांक वाहभ-२०१४/प्र.क्र.५/सेवा-५, दिनांक ०४.०६.२०१४

प्रस्तावना -

शासन सेवेत कार्यरत असलेल्या अंध कर्मचाऱ्यांना उपरोक्त शासन परिपत्रक दि.०४ जून, २००१ मधील परिच्छेद क्रमांक ४ मध्ये नमूद केलेल्या अंधत्वाच्या व्याख्येनुसार शासकीय रुग्णालयातील नेत्रोपचार विभागाच्या प्रमुखाने अंधत्व असल्याबाबत शिफारस केल्यास, अशा कर्मचाऱ्यांना सर्वसाधारण कर्मचाऱ्यांना अनुज्ञेय असलेल्या वाहतूक भत्त्याच्या यथास्थिती दुप्पट अथवा त्यापेक्षा जास्त दराने विशेष वाहतूक भत्ता अनुज्ञेय करण्यात आलेला आहे. सदर विशेष वाहतूक भत्त्याच्या दरामध्ये उपरोक्त शासन निर्णय वित्त विभाग दिनांक ०५.०४.२०१०, दि.०३.०६.२०१४ व शासन शुद्धीपत्रक वित्त विभाग दि.०४.०६.२०१४ च्या शासन निर्णयान्वये सुधारणा करण्यात आली आहे.

काही अंध शासकीय कर्मचाऱ्यांकडून शासन परिपत्रक वित्त विभाग दि.०४.०६.२००१ मधील अंधत्वाच्या व्याख्येची पूर्तता होत नसल्याने त्यांना विशेष दराचा वाहतूक भत्ता अनुज्ञेय ठरत नव्हता. अशा प्रकारे विशेष वाहतूक भत्ता मंजूरीस अपात्र ठरलेल्या शासकीय कर्मचाऱ्यांच्या वतीने महाराष्ट्र राज्य अपंग कर्मचारी/अधिकारी संघटना, मुंबई यांनी मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे याचिका क्रमांक ९४७८/२०१२ दाखल केली होती. या याचिकेत मा. उच्च न्यायालयाने दिनांक १८.०१.२०१३ रोजी दिलेल्या न्याय निर्णयानुसार अंध कर्मचाऱ्यांना विशेष वाहतूक भत्ता अनुज्ञेय करण्यासाठी केंद्र शासनाच्या सन १९९५ च्या अपंग (समान हक्कांचे संरक्षण व संपूर्ण सहभाग) अधिनियमातील कलम २(ब) नुसार अंधत्वाची व्याख्या, वेळोवेळी सदर अधिनियमात झालेल्या सुधारणा विचारात घेऊन करावी, असे राज्य शासनास आदेशित केले होते. उपरोक्त पार्श्वभूमीवर विशेष वाहतूक भत्त्याच्या प्रयोजनासाठी शासन परिपत्रक, वित्त विभाग दिनांक ०४.०६.२००१ अन्वये केलेली अंधत्वाची व्याख्या रद्द करुन केंद्र शासनाच्या, अपंग व्यक्तींचे हक्क अधिनियम, २०१६ दिनांक २८.१२.२०१६ मधील व्याख्येनुसार बदल करण्याबाबतचा प्रस्ताव, काही काळ शासनाच्या विचाराधीन होता. तदनुसार राज्य शासकीय अंध कर्मचाऱ्यांना, विशेष वाहतूक भत्त्याच्या पात्रतेकरीता पुढीलप्रमाणे अंधत्वाची व्याख्या विहीत करण्यात येत आहे.

**शासन निर्णय**

Blindness means a condition where a person has any of the following conditions, after best correction-

Total absence of sight; or Visual acuity less than ३/६० or less than १०/२०० (snellen) in the better eye with best possible correction; or Limitation of the field of vision subtending an angle of less than १० degree, अशी केलेली आहे.

अंध शासकीय कर्मचाऱ्यांना विशेष दराने वाहतूक भत्ता मंजूरीच्या प्रयोजनार्थ वरीलप्रमाणे विहीत केलेल्या अंधत्वाचे शासकीय रुग्णालयाच्या नेत्रोपचार विभाग प्रमुखाचे वैद्यकीय प्रमाणपत्र सादर केल्यानंतर शासन निर्णय वित्त विभाग दिनांक ०३.०६.२०१४ व शासन शुद्धीपत्रक वित्त विभाग दिनांक ०४.०६.२०१४ नुसार विहीत केलेल्या विशेष दराने वाहतूक भत्ता अनुज्ञेय ठरेल.

हा शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या तारखेपासून अंमलात येईल.

सदर शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य या विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक १८७, दिनांक २८.०२.२०१७ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४०३१७३५५०९६०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhalchandra Jagannath Gadekar

Digitally signed by Bhalchandra Jagannath Gadekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=d2671e08dbf49e6a42b865d026c3f07bc1eb8254056eab8fa6b4b0fb72dd47ba, cn=Bhalchandra Jagannath Gadekar
Date: 2017.04.03 17:39:06 +05'30'

**( भा. ज. गाडेकर )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३. सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
४. सर्व विधानमंडळ सदस्य, विधान मंडळ मुंबई,
५. सचिव, मा. सभापती, विधान परिषद, विधान मंडळ मुंबई,
६. सचिव, मा. अध्यक्ष, विधान सभा, विधान मंडळ मुंबई,
७. सर्व मंत्रालयीन विभाग,
८. सर्व विभागीय आयुक्त,

९. मंत्रालयाच्या सर्व विभागाखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
१०. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
११. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर,
१२. महालेखापाल-१ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,
१३. महालेखापाल-२ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, नागपूर,
१४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१६. सिनियर रिसर्च ऑफिसर, पे रिसर्च युनिट, भारत सरकार, वित्त मंत्रालय (व्यय विभाग), खोली क्र.२६१, नार्थ ब्लॉक, नवी दिल्ली,
१७. *प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई,
१८. *प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,
१९. *सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
२०. *प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
२१. *प्रबंधक, लोकआयुक्त व उपलोकआयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
२२. *सहसंचालक, ऑल इंडीया इन्स्टिट्यूट ऑफ लोकल सेल्फ गव्हर्नमेंट, मुंबई,
२३. शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई (२० प्रती),
२४. ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई (२० प्रती),
२५. नगर विकास विभाग (यूडी-१०), मंत्रालय, मुंबई (२० प्रती),
२६. कृषि पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास, मत्स्य्व्यवसाय विभाग, मंत्रालय, मुंबई (२० प्रती),
२७. आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई (२० प्रती),
२८. संचालक, लेखा व कोषागार, मुंबई,
२९. मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई,
३०. उपमुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई/ पुणे/ नागपूर / औरंगाबाद/ नाशिक/ अमरावती.
३१. जिल्हा लेखापरिक्षा अधिकारी, स्थानिक निधी हिशेब, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहूरी, जिल्हा -अहमदनगर
३२. जिल्हा लेखापरिक्षा अधिकारी, स्थानिक निधी हिशेब, कोकण कृषि विद्यापीठ, दापोली,
३३. जिल्हा -रत्नागिरी
३४. जनसंपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई,
३५. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
३६. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
३७. शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे (२५ प्रती)
३८. कला संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई (४० प्रती)
३९. संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई (१०० प्रती)
४०. *सचिव राज्य माहिती आयोग
४१. संचालक, तांत्रिक शिक्षण, द्वारा तंत्र शिक्षण संचालक, मुंबई (२५० प्रती)

४२. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक (प्रत्येकी १० प्रती)
४३. सर्व विभागीय तंत्र शिक्षण उपसंचालक (प्रत्येकी १० प्रती)
४४. सर्व जिल्हा परिषदांचे शिक्षणाधिकारी
४५. आयुक्त, महानगर पालिका, नागपूर
४६. प्रशासकीय अधिकारी, पश्चिम महाराष्ट्रातील नगरपालिका शिक्षण मंडळे
४७. (पुणे/कोल्हापूर/सोलापूर या महानगरपालिकांची शिक्षण मंडळे यांसह) मुख्य अधिकारी, सर्व नगर पालिका
४८. कार्यकारी अधिकारी, कॅन्टोनमेंट बोर्ड, खडकी/ देहू रोड/देवळाली/अहमदनगर
४९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
५०. संचालक आदिवासी कल्याण, महाराष्ट्र राज्य, नाशिक (१० प्रती)
५१. संचालक समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे (१० प्रती)
५२. संचालक आदिवासी संशोधन व शिक्षण संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
५३. आदिवासी विकास आयुक्त, नाशिक
५४. सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी
५५. अपर आयुक्त, आदिवासी उपयोजना, नाशिक/नागपूर
५६. सर्व समाजकल्याण अधिकारी, वर्ग-१
५७. सर्व आदिवासी कल्याण अधिकारी
५८. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प,
५९. कुलसचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहूरी, जिल्हा अहमदनगर,
६०. कुलसचिव, मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी
६१. कुलसचिव, पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला,
६२. कुलसचिव, कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जिल्हा रत्नागिरी
६३. कुलसचिव, मुंबई विद्यापीठ, मुंबई,
६४. कुलसचिव, सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ, पुणे,
६५. कुलसचिव, राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ, नागपूर,
६६. कुलसचिव, डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद
६७. कुलसचिव, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर,
६८. कुलसचिव, संत गाडगेबाबा अमरावती विद्यापीठ, अमरावती
६९. कुलसचिव, श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी महिला विद्यापीठ, मुंबई,
७०. कुलसचिव, उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगांव
७१. कुलसचिव, सोलापूर विद्यापीठ, सोलापूर
७२. अधिक्षक, वेतन पथक, सर्व जिल्हे
७३. शिक्षण निरीक्षक, बृहन्मुंबई (उत्तर, दक्षिण व पश्चिम विभाग)
७४. सर्व कन्याशाळा निरीक्षका
७५. सर्व जिल्ह्याचे वरीष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण विभाग)
७६. शिक्षण अधिकारी, बृहन्मुंबई महानगर पालिका

७७. संचालक, नगर पालिका प्रशासन, मुंबई
७८. सर्व प्रादेशिक संचालक, नगरपालिका प्रशासन
७९. बहुजन समाज पार्टी, डी-१ इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई १ (५ प्रती)
८०. भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ. बॅरॅक नं. , योगक्षेम समोर, वसंतराव गवस चौक, नरीमन पॉईंट, मुंबई २० (५ प्रती)
८१. भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभुवन, एस. व्ही. पटेल रोड, मुंबई ४ (५ प्रती)
८२. भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई १३ (५ प्रती)
८३. इंडीयन नॅशनल कॉँग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉँग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई २५ (५ प्रती)
८४. नॅशनॅलिस्ट कॉँग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरीमन पॉईंट, मुंबई २१ (५प्रती)
८५. शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई २५ (५ प्रती)
८६. वित्त विभागातील सर्व कार्यासन,
८७. निवडनस्ती, वित्त विभाग/सेवा-५,
पत्राने